**भायखळा जिल्हा कारागृहाकरिता एक नग डेंटलचेअर, हर्ट फाऊंडेशन, मुंबई या संस्थेकडुन देणगी स्वरुपात स्वीकारणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः जेएलएम-१०१४/प्र.क्र.१७६/तुरुंग-२.**

जागतिक व्यापार केंद्र, सेंटर नं. १, ३० वा मजला,
कफ परेड, मुंबई-४०० ००५.
दिनांक: ५ सप्टेंबर, २०१४.

**वाचा**

**१) अपोमवकाम यांचे पत्र क्रमांकः मेन्टेनन्स/वैद्यकीयउपकरणे/७३५७, दि.११.०७.२०१४.**

**प्रस्तावना**

महाराष्ट्र कारागृह नियमावली, १९७९ प्रकरण-३१- "कैद्यासाठी सुविधा" नियम क्र. ३७ नुसार बंदीजनांचे उपयोगासाठी लोकांनी दिलेल्या भेट वस्तु स्वीकारण्यास कारागृह महानिरीक्षक हे सक्षम आहेत. तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र/१०.१८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील भाग पहिला, उपविभाग-४, अ.क्र. ५ नुसार रुपये १ लक्षपर्यंत देणगी स्वरुपात स्वीकारण्याचे अधिकार त्यातील विहित अटी व शर्तींच्या अधीन राहुन विभाग प्रमुख यांना आहेत व त्यावरील वस्तु देणगी स्वरुपात स्वीकारण्याकरिता शासनाची मान्यता आवश्यक आहे. एक नग डेंटलचेअरची किंमत रुपये १.६० लक्ष इतकी असल्यामुळे सदर डेंटल चेअर स्वीकारण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय

भायखळा जिल्हा कारागृहाकरिता एक नग डेंटलचेअर, हर्ट फाऊंडेशन, मुंबई या संस्थेकडुन देणगी स्वरुपात स्वीकारण्यास वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.

विअप्र/१०.१८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील भाग पहिला, उपविभाग-४, अ.क्र. ५ मधील विहित अटी व शर्तीच्या अधीन राहुन मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०३१५१०५०६६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Ishwar Giri

Digitally signed by Ravindra Ishwar Giri
DN: CN = Ravindra Ishwar Giri, C = IN, S = maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME
Date: 2014.09.05 16:35:24 +05'30'

(र. ई. गिरी)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग.

प्रत,

- अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
- कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य, पुणे,
- विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह), दक्षिण विभाग, मुंबई,
- अधीक्षक, मुंबई मध्यवर्ती कारागृह, मुंबई,
- अधीक्षक, भायखळा जिल्हा कारागृह, भायखळा, मुंबई,
- निवड नस्ती (तुरुंग-२).